**नवनिर्मित नगरपरिषदा / नगरपंचायतींच्या आकृतीबंधातील वर्ग-३ व वर्ग-४ च्या मंजूर व रिक्त पदावर तत्कालीन ग्रामपंचायतींमधील सफाई कर्मचाऱ्यांचे समावेशन करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्र. एमसीओ-२०२१/प्र.क्र.१२/नवि-१४**
मंत्रालय (मुख्य इमारत), ४ था मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मुंबई ४०० ०३२
दिनांक : ०६ डिसेंबर, २०२१

**संदर्भ** :- १. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.एमसीओ-२०१५/प्र.क्र.१३९/नवि-१४, दि.१९.०१.२०१७.
२. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.एमसीओ-२०१७/प्र.क्र.२२/नवि-१४, दि.३०.११.२०१७.
३. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.एमसीओ-२०१७/प्र.क्र.२२/नवि-१४, दि.२०.०८.२०१८.
४. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.एमसीओ-२०१७/प्र.क्र.२२/नवि-१४, दि.११.०७.२०१९
५. नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांचे क्र.नपप्रसं/न.पं./सफाई कामगार आकृतीबंध/ प्र.क्र.०४-१९/ का-४/१६०७, दि.१४.०५.२०२१ चा प्रस्ताव.

**प्रस्तावना:-**

राज्यातील नवनिर्मित नगरपरिषदा/ नगरपंचायतींमध्ये कार्यरत तत्कालीन ग्रामपंचायत कर्मचाऱ्यांचे समावेशन करण्याबाबतचे धोरण शासन निर्णय १९.०१.२०१७ अन्वये विहित करण्यात आले. तद्नंतर समावेशनातील अडचणी, समावेशनासाठीची निश्चित केलेली अर्हता, कर्मचारी संघटनेनी दिलेली निवेदने व क्षेत्रिय स्तरावरील प्राप्त अहवाल विचारात घेऊन, समावेशनसाठी विहित केलेल्या अर्हतेत शासन निर्णय दि.३०.११.२०१७, दि.२०.०८.२०१८ व दि.११.०७.२०१९ अन्वये वेळोवेळी सुधारणा करण्यात आली आहे.

नवनिर्मित नगरपरिषदा व नगरपंचायतींच्या आकृतीबंधात सफाई कर्मचाऱ्यांची नियमित पदे मंजूर नसल्याने ग्रामपंचायतींमध्ये कार्यरत सफाई कर्मचाऱ्यांचे समावेशन झालेले नाही. विविध नवनिर्मित नगरपरिषदा/ नगरपंचायतींमध्ये ग्रामपंचायत कालीन सुमारे १४७७ सफाई कर्मचारी कार्यरत आहेत. नवननिर्मित नगरपरिषदा/ नगरपंचायतींमध्ये तत्कालीन ग्रामपंचायत कर्मचाऱ्यांच्या समावेशनाबाबतच्या शासनाच्या प्रचलित धोरणानुसार समावेशनाची प्रक्रिया पूर्ण होऊन देखील मंजूर व रिक्त असणाऱ्या वर्ग-३ व वर्ग-४ च्या पदावर नगरपरिषदा/ नगरपंचायतींच्या निर्मितीच्या प्राथमिक उद्घोषणेपुर्वीपासून कार्यरत तत्कालीन ग्रामपंचायतींमधील सफाई कर्मचाऱ्यांचे समावेशन करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-**

नवननिर्मित नगरपरिषदा/ नगरपंचायतींमध्ये तत्कालीन ग्रामपंचायत कर्मचाऱ्यांच्या समावेशनाबाबत संदर्भिय शासन निर्णयांन्वये विहीत केलेल्या धोरणानुसार समावेशनाची प्रक्रिया पूर्ण होऊन देखील मंजूर व रिक्त असणाऱ्या वर्ग-३ व वर्ग-४ च्या पदावर नगरपरिषदा/ नगरपंचायतींच्या निर्मितीच्या प्राथमिक उद्घोषणेपुर्वीपासून कार्यरत तत्कालीन ग्रामपंचायतींमधील सफाई कर्मचाऱ्यांचे समावेशन करण्यास खालीलप्रमाणे मान्यता देण्यात येत आहे:-

(अ) नवनिर्मित नगपरिषदा/ नगरपंचायतींच्या मंजूर आकृतीबंधातील पदांवर तत्कालीन ग्रामपंचायत कर्मचाऱ्यांचे समावेशन करण्याबाबत शासन निर्णयान्वये विहीत केलेल्या कार्यपध्दतीचे पालन केल्यानंतर व तद्नुसार समावेशन होऊनही रिक्त राहणाऱ्या वर्ग-३ व वर्ग-४ च्या रिक्त व उपलब्ध पदांवर नगपरिषद/

नगरपंचायतींच्या प्राथमिक उद्घोषणेच्या दिनांकापुर्वीपासून कार्यरत तत्कालीन ग्रामपंचायतींमधील विहीत शैक्षणिक व तांत्रिक अर्हता धारण करणाऱ्या इच्छूक सफाई कर्मचाऱ्यांचे समावेशन करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

(ब) वर्ग-३ व वर्ग-४ च्या पदांसाठी विहीत तांत्रिक अर्हता पुर्ण न करणाऱ्या सफाई कर्मचाऱ्यांना महाराष्ट्र पर्यावरण अभियांत्रिकी प्रशिक्षण आणि संशोधन संस्था (मित्रा), नाशिक या संस्थेत संबंधित पदासाठी आवश्यक तांत्रिक अर्हतेबाबत ६ महिन्यांचे प्रशिक्षण पुर्ण करुन त्यांचे वर्ग-३ व वर्ग-४ च्या मंजूर व रिक्त पदांवर समावेशन करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर समावेशन खालील अटी व शर्तीच्या अधिन अनुज्ञेय असेल:-

(अ) नवनिर्मित नगरपरिषदा/ नगरपंचायतींमध्ये भुतपुर्व ग्रामपंचायत कर्मचाऱ्यांचे समावेशन करण्याबाबत शासन निर्णय दि.१९.०१.२०१७ व तद्नंतरच्या अनुषंगिक शासन निर्णयान्वये विहीत धोरणात्मक बाबी व अटी शर्ती लागू राहतील.

(ब) यापूर्वी विहीत शासन धोरणान्वये निश्चित केलेले समावेशनाचे टप्पे व प्रक्रिया पुर्ण झाली असणे अभिप्रेत आहे.

(क) सदर समावेशन सफाई कर्मचाऱ्यांच्या ज्येष्ठतेनुसार करण्यात यावे.

(ड) मंजूर आकृतीबंधातील रिक्त पदे विचारात घेऊन संबंधित नगरपरिषदा/ नगरपंचायती, संबंधित जिल्हा व तद्नंतर विभागातील रिक्त पदे यानुसार क्रमाने सदर समावेशनासाठी प्रक्रिया करण्यात यावी.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११२०६१४५१३२४१२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sachin Dattatray Sahasrabuddhe

Digitally signed by Sachin Dattatray Sahasrabuddhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7db996f7c088dbf2d76ad85484362957aab596e46ec268eca3b9822aa62fd32b, serialNumber=67648ad8c40ecf8d0f911eaf72d918202f02f540836a5f65e8b71c0a69d61291, cn=Sachin Dattatray Sahasrabuddhe
Date: 2021.12.06 14:53:03 +05'30'

**( सचिन द. सहस्रबुध्दे )**
**अवर सचिव**

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.उप मुख्यमंत्री महोदयांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.विरोधी पक्षनेते, दोन्ही सभागृह, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई.
४. सर्व मा.मंत्री / मा.राज्यमंत्री महोदयांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई.
७. विभागीय आयुक्त तथा प्रादेशिक संचालक (सर्व).
८. जिल्हाधिकारी (सर्व).
९. सर्व नगरपरिषदा / नगरपंचायती यांचे मुख्याधिकारी.
१०. निवडनस्ती (नवि-१४).